**महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत लेखाशिर्ष ३४५१ २९०६ अंतर्गत प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षासाठी निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राजस-२०१८/प्र.क्र.२१९ /५-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ३० जून, २०१८

वाचा :- १) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन०९/प्र.क्र.३९/०९/१२अ, दि.२३/९/२०११
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दि.९/५/२०१४
३) शासन निर्णय सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, दि.०४/०४/२०१८

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन क्र.१ च्या अनुषंगाने अधिकारी व कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देण्याबाबतचे राज्य शासनचे प्रशिक्षण धोरण निश्चित झाले आहे. सदर धोरणानुसार मुख्य सचिवांच्या अध्यक्षेतेखाली राज्य प्रशिक्षण कृती दल स्थापन केले असून यशदा, पुणे ही शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून कार्यरत राहणार आहे.

सहकार विभागांतर्गत राज्यातील जिल्हा मध्यवर्ती बँक, नागरी सहकारी बँका, सहकारी पतसंस्था, विविध कार्यकारी संस्था, मजुर सहकारी संस्था, पाणीपुरवठा संस्था, नोकरदार सहकारी पतसंस्था, गृहनिर्माण सहकारी संस्था, सावकारी परवाने , सहकारी साखर कारखाने, कृषी उत्पन्न बाजार समित्या, खरेदी विक्री संघ अशा विविध सहकारी संस्थांचे प्रशासकीय व लेखापरीक्षण कामकाजावर नियंत्रण ठेवले जाते. महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० व नियम १९६१, महाराष्ट्र कृषी पणन (नियमन) अधिनियम १९६३, महाराष्ट्र सावकारी (नियमन) अधिनियम २०१४ इत्यादी अधिनियमांन्वये आदेश पारीत केले जातात. क्षेत्रिय स्तरावर शासनाच्या विविध योजनांची प्रभावीपणे अंमलबजावणी करणे सहकारी संस्थांच्या कामकाजावर नियंत्रण / मार्गदर्शन केले जाते. या सर्व कामकाजाचा व्याप लक्षात घेता अधिकारी व कर्मचारी यांना कामकाज गुणवत्तापुर्वक पार पाडण्यासाठी क्षेत्रिय अधिकारी व कर्मचारी यांना न्यायालयीन कामकाज व कायदेविषयक सखोल तांत्रिक प्रशिक्षण देणे गरजेचे आहे. प्रशिक्षणामुळे अधिकारी व कर्मचारी यांच्या कामाच्या गुणवत्तेत वाढ होण्यास मदत होईल.

सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षासाठी शासकीय अधिकारी / कर्मचा-यांना प्रशिक्षण यासाठी लेखाशिर्ष ३४५१ २९०६ मध्ये रु.२५.०० लक्ष एवढी रक्कम अर्थ संकल्पीत करण्यात आली आहे. त्यानुसार सदर निधी वितरित करण्याचीबाब शासनाच्या विचाराधीन होती

**शासन निर्णय :-**

सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षासाठी राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत सहकार आयुक्तालयाच्या अधिपत्याखालील अधिकारी / कर्मचा-यांना प्रशिक्षण देण्यासाठी मुख्यलेखाशिर्ष ३४५१, सचिवालयीन आर्थिक सेवा, सेवा (००) (०१) शासकीय कर्मचा-यांना प्रशिक्षण (३४५१२९०६), ५० इतर खर्च या लेखाशिर्षांतर्गत रु.२५.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतुद करण्यात आलेली आहे. त्यानुसार सहकार

आयुक्त कार्यालयाच्या रु.२५.०० लक्ष इतक्या निधी वितरणाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर ३४५१ २९०६ या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित केलेल्या रु.२५.०० लक्ष पैकी ७०% रक्कम म्हणजेच रु.१७,५०,०००/- (रुपये सतरा लक्ष पन्नास हजार मात्र) इतका निधी आता उपलब्ध असल्याने सदर निधी या योजनेच्या प्रयोजनार्थ खर्च करण्यासाठी सहकार आयुक्त यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

या शासन निर्णयाद्वारे मंजुर करण्यात आलेला रु.१७,५०,०००/- (रुपये सतरा लक्ष पन्नास हजार मात्र) एवढा निधी वितरीत करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणुन व लेखा अधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे. प्रशिक्षणासाठी वितरीत करावयाची रक्कम मुख्यलेखाशिर्ष ३४५१, सचिवालयीन आर्थिक सेवा (००) (०१) शासकीय कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण (३४५१ २९०६), ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची पडेल.

शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१० मे, २०१६ मधील परिच्छेद “अ” नुसार या प्रकरणी माहिती खालीलप्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| विभागास प्रदान वित्तीय अधिकार | शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं २०१६/ प्र.क्र.८९/अर्थ-३,दि.२०/०४/२०१६ अन्वये खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत. |
| मंजुर निधी | रू.२५.०० लक्ष |
| मागील तीन महिन्यांपुर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५ % किंवा अधिक निधी खर्च झालेला आहे. | सन २०१८-१९ मध्ये यापूवी निधी वितरित अथवा खर्च झालेला नाही. |
| ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे., त्या लेखाशिर्षाअंतर्गत १ वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही | या लेखाशिर्षअंतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. या लेखाशिर्षाअंतर्गत एक वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. |
| स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांच्याकडुन राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे. | लागु नाही |
| वैयक्तीक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे | लागु नाही |
| बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिका-यांची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा | लागु नाही |
| अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापुर्वी अशा खरेदीसाठी प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत | लागु नाही |
| खरेदी विषयक प्रक्रीया अद्यावत संबंधीत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेस असावा | लागु नाही |
| साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरीत करावी | लागु नाही |

या शासन निर्णयान्वये मंजुर निधीचा विनियोग आणि या संदर्भातील अनुपालन अहवाल व निधी उपयोगिता प्रमाणपत्र सहकार आयुक्त व निबंधक , सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन, त्याचा सांकेतांक २०१८०७०२१४३२४४७९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manjiri Ganeshbhushan Joshi

Digitally signed by Manjiri Ganeshbhushan Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=91b4708db2a52d675f7f30d81444f3844833dfc7c86d4244ee1075c97c713180, serialNumber=7d5731d128ab41d6a090557a2e9658b7382ac03af6e239ba66cc1cf9a6cf2f52, cn=Manjiri Ganeshbhushan Joshi
Date: 2018.07.02 14:34:36 +05'30'

**( मं.ग.जोशी )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रत :**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
४. महासंचालक, यशदा,पुणे
५. वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती) नागपूर
६. अपर मुख्य सचिव (सहकार) मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
७. महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
९. जिल्हा कोषगार अधिकारी, पुणे / नागपूर
१०. अवर सचिव / कक्ष अधिकारी (१७-स / १६-स / १२-स), स.प.व.विभाग,मंत्रालय,मुंबई ३२
११. सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई ३२
१२. निवड नस्ती (५-स).